महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास
महामंडळास खरेदी अनुदान मंजूर करणेबाबत.
सन- २००९-२०१०.

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक आविम -२०१०/प्र.क्र.२०/का.३
मंत्रालय, विस्तार मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च २०१०.

**वाचा :** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : टिडीसी-१०८७/प्र.क्र.८४/का.३ दिनांक २.६.१९८७

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक : टिडीसी-१०९१/प्र.क्र.३०१९/का.३ दिनांक ५.५.१९९७.

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- बीयुडी-२००९/प्र.क्र.८/का.७ दिनांक- २८ एप्रिल,२००९.

४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- बीयुडी-२००९/प्र.क्र.८/का.७ दिनांक- ३० जून,२००९.

५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक-आविम -२०१०/प्र.क्र.२०/का.३ दिनांक- ३० मार्च,२०१०.

६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- बीयुडी-२०१०/प्र.क्र.१०७ (अ)/का.६ दिनांक- ३१ मार्च,२०१०.

७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांचे पत्र क्रमांक आविम/विपणन/खरेदी अनुदान/१३८८/१०, दि.२५/०१/२०१०.

**प्रस्तावना:-** महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणा-या एकाधिकार खरेदी योजनेखाली, खरेदीसाठी होणा-या व्यापारी खर्चापोटी शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांक टिडीसी-१०९१/ प्र.क्र.३०१९/ का.३ दिनांक ५.५.१९९७ अन्वये प्रति क्विंटल रु ११.७५ प्रमाणे खरेदी अनुदान शासनाकडून देण्यात येते. त्यानुसार आदिवासी विकास महामंडळाला त्या त्या वर्षाचे लेखापरीक्षण पुर्ण होईपर्यंत एकूण देय खरेदी अनुदानाच्या ८०% इतकी रक्कम व लेखापरिक्षण पुर्ण झाल्यानंतर उर्वरीत २० % रक्कम देण्यात येते.

महाराष्ट्र राज्य, सहकारी आदिवासी विकास महामंडळाने सन २००९-२०१० या वर्षाकरीता संदर्भ क्र.३ व ४ येथील शासन निर्णयानुसार महामंडळास सहाय्यक अनुदान म्हणून रुपये ५००.०० लक्ष इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आलेली तरतूद सुधारीत अंदाजात रू. ३३३.३३ लाख अशी सिमीत करण्यात आली. महामंडळास सन २०००-२००१ ते २००५-०६ या कालावधीचे शासकीय लेखापरिक्षण पुर्ण झाले असल्याने महामंडळाने खरेदी केलेला शेतमाल व वनोपजाच्या खरेदीवर रु. ११.७५ प्रति.क्विं. या दराने २० टक्के उर्वरीत खरेदी अनुदान रु. १,२९,४०,०१४/- एवढे अनुज्ञेय आहे. तसेच सन २००६-०७ ते २००९-१० पर्यंत शासकीय लेखापरिक्षण पुर्ण झाले नसल्याने खरेदी अनुदानापोटी ८०% येणे रक्कम रु. २,९३,९४,१३७/- असा एकुण रु

४,२३,३४,१५१/- महामंडळास उपलब्ध करुन दयावयाचा होता. त्यापैकी एकूण रू. ३३३.३३ लक्ष एवढे खरेदी अनुदान संदर्भ क्रं. ५ येथील दि. ३० मार्च, २०१० च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. उर्वरीत रू. ८९.६७ लक्ष एवढा निधी महामंडळास उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक या महामंडळाचे सन २०००-२००१ ते २००५-०६ या कालावधीचे शासकीय लेखापरिक्षण पुर्ण झाले असल्याने महामंडळाने खरेदी केलेला शेतमाल व वनोपजाच्या खरेदीवर रु. ११.७५ प्रति.क्विं. या दराने २० टक्के उर्वरीत खरेदी अनुदान तसेच सन २००६-०७ ते २००९-१० पर्यंत शासकीय लेखापरिक्षण पुर्ण झाले नसल्याने खरेदी अनुदानापोटी ८०% येणे रक्कमेपैकी असा खरेदी अनुदानापोटी देय असलेला **रु. ८९.६७ लाख ( रु. एकोणनव्वद लाख सदुसष्ट हजार फक्त )** एवढे खरेदी अनुदान पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करून देण्यात आला आहे. सदरचा निधी वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी सदरहू रक्कम **रु. ८९.६७ लाख ( रु. एकोणनव्वद लाख सदुसष्ट हजार फक्त )** एवढा निधी कोषागारातून काढून तो महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर खर्च हा मागणी क्र." टि-५, लेखाशिर्ष-२४२५- सहकार- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- जनजाती क्षेत्र उपयोजना-(००) (१०८)-इतर सहकारी संस्थांना सहाय्य -राज्य योजनांतर्गत योजन (०१) (०१) महाराष्ट्र राज्य सहकारी जनजाती विकास महामंडळास वित्तीय सहाय्य, (२४२५ ०८५३) ३३ अर्थसहाय्य" या शिर्षाखाली खर्ची टाकावा व तो त्या शिर्षाखाली सन २००९-२०१० साठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५३/ व्यय-१४ /१० दिनांक २६.३.२०१० तसेच पुनर्विनियोजन आदेश आदिवासी विकास विभाग क्रमाक बीयुडी-२०१०/प्र.क्र.१०७ (अ)/का.६ दिनांक- ३१ मार्च,२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००४०१००३७०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सो. ना. बागुल )
अवर सचिव महाराष्ट्र शासन

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, मर्या. नाशिक
सहकार आयुक्त तथा निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे
सहनिबंधक सहकारी संस्था (आदिवासी विकास) नाशिक
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नविन प्रशासन भवन, मुंबई.
वित्त विभाग (सा.उ., व्यय.१४), मंत्रालय, मुंबई-३२
कक्ष अधिकारी (का.१,६ व ७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का.३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.